**संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था, नागपूर (वनामती) यांना "विभाग प्रमुख" व प्राचार्य विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था रामेती यांना "प्रादेशिक कार्यालय प्रमुख" घोषित करण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१८/प्र.क्र.१३८/३-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३१ जानेवारी, २०१९

**वाचा :**

१. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक-वनास १०००/प्र.क्र.८९/१९अे,दि. १७ जुलै,२००१
२. शासन निर्णय , वित्त विभाग, क्रमांक- विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७ एप्रिल,२०१५
३. संचालक, वनामती नागपूर यांचे पत्र क्र.वनामती/आस्था/वि.प्र/प्राधिकार/१८६०/१८, दि. १३ जून,२०१८

**प्रस्तावना :**

राज्यातील कृषि विकास घटकाचे महत्व लक्षात घेऊन कृषि आणि कृषिशी निगडीत विषयाबाबत अद्यावत प्रशिक्षण देण्याच्या दृष्टीने नागपूर येथे वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, ही संस्था शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून घोषित करण्यात आली असून राज्यातील नागपूर, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नाशिक, कोल्हापूर व खोपोली येथील सात विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था या शिखर प्रशिक्षण संस्थेच्या सहकारी व संलग्न संस्था म्हणून घोषित करण्यात आल्या आहेत. दिनांक १७ जुलै,२००१ च्या शासन निर्णयान्वये वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर (वनामती) ही शिखर प्रशिक्षण संस्था आणि तिच्या विभागीय सात संलग्न संस्था स्वायत्त संस्था म्हणून घोषित करण्यात आल्या आहेत.सदर संस्थाचे कार्यालयीन कामकाज सुरळीतपणे पार पाडण्याच्या दृष्टीने संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था, नागपूर (वनामती) यांना विभाग प्रमुख व प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती) यांना प्रादेशिक कार्यालय प्रमुख घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्या अनुषंगाने शासन पुढील निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था, नागपूर (वनामती) यांना विभाग प्रमुख व प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती) यांना प्रादेशिक कार्यालय प्रमुख घोषित करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयाद्वारे संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था, नागपूर (वनामती) यांना विभाग प्रमुख म्हणून व प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती) यांना प्रादेशिक कार्यालय प्रमुख म्हणून प्राप्त होणारे अधिकार हे केवळ वित्तीय बाबी पुरतेच मर्यादित राहतील.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि. १७.४.२०१५ रोजीच्या शासन निर्णयानुसार विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१३११६४८५६३३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Ashok Maroti Atram
Date: 2019.01.31 17:00:07 +05'30'

**(अशोक आत्राम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
२) मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३) सचिव ( कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
५) संचालक, (आत्मा), तथा कृषि नोडल अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) संचालक,वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर,
७) प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन संस्था,खोपोली,ता.खानापूर,जि.रायगड.
८) प्राचार्य,विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,गेट क्रमांक ४,शहाजी नगर,लाईन बाजार, कोल्हापूर
९) प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,बुलडोजर युनिट,शिवाजी नगर,पोस्ट ऑफीस, जवळ, च-होली, पुणे.
१०) प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,संभाजी चौक, उंटवाड रोड,नाशिक.
११) प्राचार्य,विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,.शहानुर मिया, दर्गा रोड, औरंगाबाद.
१२) प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,तपोवन रोड, अमरावती,
१३) प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,बंगला क्रमांक ६२/१, धरमपेठ, व्ही.आय.पी.रोड, सीव्हील लाईन, नागपूर.
१४) विभागीय कृषी सह संचालक (सर्व),
१५) कृषि सहसंचालक, (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६) जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी (सर्व),
१७) महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखा परिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
१८) महालेखापाल-२, महाराष्ट (लेखा परिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), नागपूर.
१९) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मंत्रालय,मुंबई.
२०) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व), बृहन्मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून
२१) वित्त विभाग (व्यय-१/अर्थसंकल्प-१३),मंत्रालय,मुंबई-३२
२२) अवर सचिव,कार्यासन २-अे,कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई ३२.
२३) निवड नस्ती कार्यासन ३-अे.